**कोतवालांना सणानिमित्त देण्यात येणारे सण अग्रीम वाढविण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केओटी-२०१३/प्र.क्र.३९४/ई-१०**
१ ला मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८.१०.२०१६

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक.केओटी-१०८०/सीआर२३६/८०/ई-१०, दिनांक २४ ऑक्टोबर, १९८०

**प्रस्तावना :-**

राज्यातील कोतवालांना संदर्भाधिन शासन निर्णयाच्या अनुषंगाने सण अग्रीम रुपये १२०/- एवढा देण्यात येत आहे. कोतवाल संघटनेच्या उक्त सण अग्रीमामध्ये वाढ करण्याच्या मागणीच्या अनुषंगाने सदर अग्रीमाच्या रकमेमध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन आता असे आदेश देत आहे की, राज्यातील कोतवालांना महत्वाच्या सणानिमित्त देण्यांत येणाऱ्या सण अग्रीमाच्या रकमेत वाढ करुन रुपये १२०/-(अक्षरी रुपये एकशे वीस फक्त ) या ऐवजी रुपये २०००/-(अक्षरी रुपये दोन हजार फक्त ) इतके सण अग्रिम प्रत्येक कोतवालास देण्यात यावे व सण अग्रिमाची रक्कम दहा समान हप्त्यात त्यांना देय मानधनातून वळती करुन घेण्यात यावी.

२. सण अग्रीम फक्त पुढील सणांना तसेच सामान्य प्रशासन विभागाकडून वेळोवेळी घोषित करण्यात येणाऱ्या सणांसाठीच अनुज्ञेय राहील :-

(i) दिवाळी
(ii) रमझान ईद
(iii) ख्रिसमस
(iv) पारसी नववर्षे
(v) संवत्सरी
(vi) रोश-होशना
(vii) वैशाखी पोर्णिमा (भगवान बुध्द जसंती)
(viii) स्वातंत्र्य दिन
(ix) प्रजासत्ताक दिन.

तथापि पुर्वी घेतलेला सण अग्रिम वसूल केल्यानंतरच पुढील सण अग्रिम मंजूर करता येईल.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २९६/२०१६/व्यय-९, दिनांक २५.१०.२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. हे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१६१०२८१५५१२०९२१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vishnu F Patil

Digitally signed by Vishnu F Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=264f8435a8edb2c1c8b64cb255972e96fdc0488ce1829e3505518f408a612b02, cn=Vishnu F Patil
Date: 2016.10.28 15:55:02 +05'30'

**(विष्णु ल.फटागंरे-पाटील)**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र १ ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा परीक्षा) व ( लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. सर्व कोषागार अधिकारी.
५. सर्व विभागीय आयुक्त,
६. सर्व जिल्हाधिकारी,
७. सर्व उपविभागीय अधिकारी,
८. सर्व तहसिलदार,
९. वित्त विभाग, कार्यासन क्रमांक.व्यय-९, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०. निवड नस्ती कार्यासन- ई-१०, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.